रस्ता सुरक्षा निधीमधून करावयाच्या खर्चाच्या प्रस्तावाबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन निर्णय क्रमांकः एमव्हीआर-०८१७/प्र.क्र.४०१/परि-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ जून, २०२०.

**संदर्भ :-** १) शासन पत्र समक्रमांक दि.२०.०३.२०२० रोजी निर्गमित केलेले इतिवृत्त.
२) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०८१७/प्र.क्र.४०१/परि-२, दि. १८ डिसेंबर, २०१८.
३) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०८१६/प्र.क्र.४५७/परि-२, दि. ०९ फेब्रुवारी, २०१७.
४) शासन निर्णय क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. ०१ सप्टेंबर, २०१६.
५) शासन अधिसूचना क्र.एमव्हीआर-०७१६/प्र.क्र.३२४/परि-२, दि. १७ ऑक्टोबर, २०१६.

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.२९५/२०१५ यामध्ये रस्ता सुरक्षा विषयक बाबींचा वेळोवेळी आढावा घेऊन मा.सर्वोच्च न्यायालयास अहवाल सादर करण्यासाठी रस्ता सुरक्षा समितीची स्थापना केली आहे. सदर समितीने रस्ता सुरक्षाविषयक कामकाजासाठी स्वतंत्रपणे रस्ता सुरक्षा निधी निर्माण करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्यानुसार रस्ता सुरक्षासंदर्भात विविध प्रकल्पांना मान्यता देण्याकरीता संदर्भाधिन क्र. ४ येथील दि.०१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. उक्त प्रयोजनासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.०३.०३.२०२० रोजी बैठक होवून सदर बैठकीचे इतिवृत्त संदर्भाधिन क्र.१ येथील दि.२०.०३.२०२० च्या पत्रान्वये निर्गमित केले आहे. उक्त बैठकीतील मान्यता दिलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या रस्ता सुरक्षा समितीने दिलेल्या निर्देशानुसार रस्ता सुरक्षा संदर्भात विविध प्रस्तावांना मान्यता देण्याकरीता मा.मुख्यसचिव यांच्या अध्यक्षतेखाली "रस्ता सुरक्षा निधी नियंत्रण समिती" स्थापित करण्यात आलेली आहे. उक्त समितीने या शासन निर्णयासोबत जोडलेल्या रु.२८९,४२,००,०००/-(रू.दोनशे एकोनवद कोटी बेचाळीस लक्ष मात्र) इतक्या रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास मान्यता दिलेली आहे.

१. विभागनिहाय खर्चाचे तपशिलवार विवरणपत्र या शासन निर्णयासोबत सोबत जोडलेले आहे.

| अ.क्र. | विभाग | रक्कम (रु.लक्ष) |
|---|---|---|
| १ | परिवहन विभाग | २८४७४.०० |
| २ | महामार्ग पोलिस विभाग | ४६८.०० |
| | **एकूण** | **२८९४२.००** |

२. उपरोक्तप्रमाणे मान्यता दिलेल्या प्रस्तावांशी संबधित विभागांनी शासनाने विहित केलेल्या नियम कार्यपध्दती/धोरणानुसार खरेदीप्रक्रिया राबविण्याची जबाबदारी संबधित विभागाची राहील.

३. संबधित विभागांनी मान्यता दिलेल्या सामग्रीशी संबधित देयके अदा करण्याकरीता विहित कार्यपध्दतीनुसार बाबनिहाय /तपशिलवार विवरणपत्रासह प्रमाणीत करुन परिवहन आयुक्त कार्यालयाकडे निधी वितरणाचे प्रस्ताव सादर करावेत.

४. वरीलप्रमाणे प्राप्त झालेल्या प्रस्तावाची वित्तीय बाबी तपासून, छाननी करुन संबधित विभागास/प्राधिकरणास निधी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांची राहील.

५. उपरोक्तप्रमाणे मान्य केलेल्या प्रस्तावावरील खर्च रस्ता सुरक्षा निधीच्या प्रयोजनासाठी भारतीय रिझर्व्ह बँक मुंबई येथे परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे नावे उघडण्यात आलेल्या स्विय प्रपंजी लेखा खाते (PLA A/c) क्र. ०१५१४८०१०४१ कोड नंबर २१६७ यामधून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६१६१०५८४३६४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NITIN JYOTINATH GHIRATKAR

Digitally signed by NITIN JYOTINATH GHIRATKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb712ac44dfd391a1a4d7d8b24cf743fa81a59477dff3f6805f105ac91db1e0, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=21524d9e84e57776ba1ee448660f3699bdd08917801a19974a72d568f57f5401, ou=HOME DEPARTMENT GOVT OF MAHARASHTRA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=NITIN JYOTINATH GHIRATKAR
Date: 2020.06.23 15:17:33 +05'30'

**( नि.ज्यो.घिरटकर )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३) मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
४) मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.

५) मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
६) मा. उपसभापती,विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
८) मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई.
९) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
११) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१.
१५) वित्त विभाग (व्यय ८/कोषा ५/ अर्थसंकल्प १०) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१६) गृह विभाग (बीयुडी १/बीयुडी २/परिवहन ४) मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती/परि- २.

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीआर-०८१७/प्र.क्र.४०१/परि-२**

दिनांक : २३ जून, २०२० या सोबतचे विवरणपत्र

| अ. क्र. | विभागाचे नाव | खर्चाची बाब | प्रस्तावावरील खर्च (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| | **परिवहन विभाग** | १) राज्यातील १३ परिवहन कार्यालयांसाठी अत्याधुनिक वाहन चाचणी केंद्र (I & C Centres) उभारणी करणे. | १५६१२.०० |
| | | २) रस्ता सुरक्षा निधीमधून संगणकीकृत व अत्याधुनिक वाहन चालक पथ २२ कार्यालयात उभारणी करणे. | फर्निचरचे २८६० वगळून १२७६२.०० मान्य |
| | | ३) (अ) रस्ता सुरक्षा प्रचार व प्रसिध्दी बाबत पुस्तके व माहिती पत्रके छपाई रस्ता सुरक्षा बैठका तसेच कार्यशाळा आयोजन करणे तसेच जनजागृती व प्रसिध्दी कार्यक्रम आयोजित करणे इ. | ८५.०० |
| | | (ब) वाहन चालकांना वाहतूकीच्या नियमांचा प्रचार व प्रसार करण्याकरीता रस्ता सुरक्षा विषयक माहिती पत्रक देणे व वाहने रस्त्याच्या डाव्या बाजूने चालविण्याकरीता तसेच जड वाहनांनी रस्त्याच्या डाव्या बाजूनेच वाहने चालवणे व ओव्हरटेक करु नये, याबाबत माहिती पुस्तिका वितरीत करुन वाहन चालकांचे समुपदेशन करणे. | १५.०० |
| | **महामार्ग पोलीस विभाग** | महामार्ग पोलीस यांच्याव्दारे सादर केलेल्या प्रस्तावात ९६ मारुती अर्टीगा वाहनांपैकी उर्वरीत २६ मारुती अर्टीगा वाहनांच्या प्रस्तावास मंजूरी मिळणेबाबत. | ४६८.०० |
| | | **एकूण** | **२८९४२.००** |

*****